उपसंचालक, आरोग्य सेवा राज्य सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा, पुणे या कार्यालयाकरीता इंटरनेट सुविधेसाठी भारत संचार निगम लिमिटेड पुणे यांच्या कडून घेण्यात आलेल्या, इंटरनेट सुविधेकरीता Leased Circuit Line च्या प्रलंबित देयकास मान्यता देणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
**शासन निर्णय, क्रमांकः संकीर्ण २०२४/प्र.क्र. ११५/आरोग्य ३अ**

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २७ मार्च, २०२४.

**वाचा :**

१) **उपसंचालक आरोग्य सेवा, राज्य सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा,पुणे** यांचे पत्र क्रमांक- **उसं**आसे/**रासाआप्र/भांडार/देयके मा.३९ब/९२२९/२०२३, दि. २५.१०.२०२३**

२) उपसंचालक आरोग्य सेवा, राज्य सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा,पुणे यांचे पत्र क्रमांक- उसंआसे/रासाआप्र/भांडार/देयके मा.३९ब/२०५३/२०२४, दि. ०१.०३.२०२४.

**प्रस्तावना :**

उपसंचालक आरोग्य सेवा राज्य सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा, पुणे या कार्यालयासाठी भारत संचार निगम लिमिटेड पुणे यांचेकडून सन २०१७-१८ या वित्तीय वर्षामध्ये E-File प्रणाली राबविण्यासाठी भारत संचार निगम लि. यांच्याकडून दोन इंटरनेट लाईन्स १. LEASEDD CIRCUIT LINE Ac No. ७०००४३९१०० २. LEASED CIRCUIT LINE Ac No. ७०००४३९१३९ घेण्यात आलेल्या होत्या. भारत संचार निगम लि. पुणे यांच्या सन २०२१-२२ या कालावधीतील प्रलंबित देयकांना कार्योत्तर मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :**

उपसंचालक आरोग्य सेवा राज्य सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा, पुणे या कार्यालयासाठी भारत संचार निगम लिमिटेड पुणे यांचेकडून सन २०१७-१८ या वित्तीय वर्षामध्ये E-File प्रणाली राबविण्यासाठी भारत संचार निगम लि .यांच्याकडून दोन इंटरनेट लाईन्स 1. LEASED CIRCUIT LINE Ac No. 7000439100, 2. LEASED CIRCUIT LINE Ac No. 7000439139 घेण्यात आलेल्या होत्या .भारत संचार निगम लिमिटेड पुणे यांच्या सन २०२१-२२ या वित्तीय वर्षातील प्रलंबित देयके, एकूण रु.३,९५,३८४/- (अक्षरी तीन लक्ष पंच्याण्णव हजार तीनशे चौऱ्याऐंशी फक्त) खालील अटीच्या अधिन राहून अदा करण्यास कार्योत्तर मंजूरी देण्यात येत आहे. सदर देयकांचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

| No. | LEASED CIRCUIT LINE | Bill No. | Date | Period | Amount |
|---|---|---|---|---|---|
| 1 | Ac No. 7000439100 | NDCMH2000043372 | 03.02.2021 | 01.04.2021 To 31.03.2022 | 3,49,862/- |
| 2 | Ac No. 7000439139 | NDCMH2000043231 | 03.02.2021 | 01.04.2021 To 31.03.2022 | 45,522/- |
| | | | | Total Rs. | **3,95,384/-** |

अटी व शर्ती:-

१) यापूर्वी देण्यात आलेल्या कार्यरंभ आदेशातील व करारातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदार संबंधित अधिकाऱ्याची राहील.

२) सदर प्रलंबित देयके अदा करतांना वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचना/शासन निर्णय/परिपत्रके/नियम यांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित अधिकाऱ्याची राहील.

३) सदर देयके योग्य असल्याची तसेच प्रलंबित देयके दुबार अदा करण्यात आले नसल्याची खातरजमा करुनच अदायगी करण्यात यावी. याबाबतची जबाबदारी क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

४) महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ मधील नियम क्र. १५१(१) मध्ये विहीत करण्यात आलेला नमूना साक्षांकित केल्याची खात्री करावी.

५) उपसंचालक आरोग्य सेवा राज्य सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा, पुणे कार्यालयाकडे ज्या कार्यालयांची देयके प्राप्त झाली आहेत, तीच देयके जोडण्यात आली असल्याची खातरजमा करण्यात यावी.

२. सदर प्रस्तावा वरील खर्च, मागणी क्र. आर १, मुख्य लेखाशिर्ष:- २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, १०७- सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा, (०१)(०१)आरोग्य प्रयोगशाळांची स्थापना, योजनेत्तर योजना, सांकेतांक क्र. २२१० ०९८८, ०६- दूरध्वनी, वीज व पाणी यामधून सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३ विनियम, भाग-२ दि. १७ एप्रिल, २०१५ चे परिशिष्ट वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग - पहिला,उपविभाग - एक मधील अनुक्रमांक ६, नियम क्र. ४० अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या

प्राधिकारानुसार व त्यात नमूद अटीची पुर्तता करण्याच्या अटीच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२७१११८३९८६१७ असा आहे. आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ARVIND BHIMRAO MORE

Digitally signed by ARVIND BHIMRAO MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=203af2dfba7db2a4824298a34f2c9294f93396f53d7f87cd4d69fecf5cf7005f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9246B8CCD2E2CB10707678D45EA1AD26CC1E4D7BFF7BD2AA1F253A716B8C448B, cn=ARVIND BHIMRAO MORE
Date: 2024.03.27 12:36:06 +05'30'

(अ.भि.मोरे)

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा, तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. सह संचालक, (अर्थ व प्रशासन) आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, कस्तुरी बिल्डिंग, मुंबई
५. निवडनस्ती (आरोग्य-३).